**मौ. बनपेठवाडी (येराड), ता. पाटण, जि. सातारा येथे कोयना नदीवर घाट व पूर संरक्षक भिंत कामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-२०१६/ (प्र.क्र. ५५५/२०१६)/ सिं.व्य.(महसूल)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: ०६ मार्च, २०२०.

**वाचा** : १) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू १०९२/१७०-सिंव्य,(कामे) दिनांक ७ ऑगस्ट, १९९२

२) शासन निर्णय क्र. पूसंभि२०१९/(प्र.क्र.११५/२०१९) सिंव्य.म.दि.३१/८/२०१९

३) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. मकृखोविम/सिंव्य-२/३०/(८५/२०२०)/८०८ दि. १०.०२.२०२०.

**प्रस्तावना :-**

मौ. बनपेठवाडी हे गांव पंढरपूर चिपळून राज्य मार्गावर असून कराड पासून ४० कि.मी. अंतरावर बनपेठवाडी (येराड) गांव कोयना नदीच्या डाव्या तीरावर वसलेले आहे. कोयना नदीवर हेळगांव गांवाजवळ कोयना धरण असून त्याची साठवण क्षमता १०५ टीएमसी आहे. कोयना धरणाच्या सहा वक्र दरवाज्यातून सन २००५-२००६ साली पावसळ्यात जास्तीत जास्त १,१०,००० घ.फु./सेकंद व ऑगस्ट २०११ मध्ये १,३०,००० घ.फु./से.या विसर्गाने पाणी कोयना नदीत सोडण्यात आले. बनपेठवाडी (येराडा) गावाचे वरील मुक्त पाणलोट क्षेत्रावरील पर्जन्यमान व कोयना धरणातून सोडलेले पाणी यामुळे पूर परिस्थिती निर्माण होते. पुरामूळे राहती घरे, सार्वजनिक इमारती रस्ते इ.चे नुकसान होत आहे. तसेच नदीचा तीव्र तळ उतार यामुळे नदीच्या उजव्या तीराच्या जमिनीची पुरामुळे धूप होऊन गावठाणा लगतचा नदीकाठ अस्थीर होत आहे. त्यामुळे गावठाणास धोका उद्भवतो. ग्रामस्थांनी लोक वर्गणीतून यडोबा मंदिराचे नदीकडील बाजूस अंदाजे रु. १५ लक्ष खर्च करुन भिंत बांधलेली होती. सदरची भिंत जून २०११ च्या पावसाळ्यामध्ये अतिवृष्टी व कोयना नदीमध्ये सोडलेला जादा विसर्ग यामुळे सदरची भिंत ढासळली आहे व त्यामुळे येडोबा मंदिर व लगतची वस्ती यांस धोका उत्पन्न झाला आहे. सदर कामाची मागणी ग्राम पंचायत बनपेठवाडी ता. पाटण, जि. सातारा यांनी ठराव क्र. ५, दि. १८.८.२०१६ नुसार केलेली आहे. तसेच मा. श्री. शंभूराजे देसाई, तत्कालिन विधान सभा सदस्य तथा मा. राज्यमंत्री गृह (ग्रामीण), वित्त, नियोजन, राज्य उत्पादन शुल्क, कौशल्य विकास व उद्योजक, पणन यांनी यांनी यापूर्वीचे २-३ अधिवेशनात लक्षवेधी सुचना मांडली आहे. तसेच दिनांक ४/२/२०२० रोजीच्या पत्रान्वये सदर बाब

पुनश्च: मा. मंत्री (जलसंपदा) यांच्या निर्देशनास आणलेली आहे. सदर पत्रावर मा. मंत्री (जलसंपदा) यांनी सदर अंदाजपत्रक मान्यतेसाठी तातडीने सादर करावे, असे निर्देश दिले आहेत. सदर बाब विचारात घेता मौ. बनपेठवाडी (येराड) येथे कोयना नदीवर घाट व पूरसंरक्षक भिंत बांधण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत मौ. बनपेठवाडी (येराड), ता. पाटण, जि. सातारा येथे कोयना नदीवर घाट व पूरसंरक्षक भिंत बांधण्याच्या कामासाठी रू. २,३०,६०,३३०/- व अनुषंगिक खर्च रू. ३९,२०,२५५/- अशा एकूण रू. २,६९,८०,८६५/- (रू. दोन कोटी एकोणसत्तर लाख ऐंशी हजार आठशे पासष्ट रुपये फक्त ) पुर्णांकामध्ये रु. २६९.८० लक्ष (दोन कोटी एकोणसत्तर लाख ऐंशी हजार) एवढया खर्चाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०१८-१९ व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१९-२० च्या दरसूचीवर आधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) शासन निर्णय क्रमांक पुसंभि-२०१९/(प्र.क्र.११५/२०१९)/ सिंव्य(म), दिनांक ३१/०८/२०१९ मधील तरतूदी नुसार कार्यवाही करावी.

ब) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू-१०८९/२४३/८९/सिंव्य(कामे) ,दि. २१.९.१९८९ व दि.३/५/२०१८ नुसार पूर रेषा आखणी केल्यानंतरच पूर संरक्षक भिंतीची संरेखा निश्चित करावी.

क) i) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/ संकल्पने ,दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

ii) तात्रिक मान्यतेपूर्वी संरक्षक भिंतीचे संकल्पन Loft type किंवा Counter fort इ. पर्यायांचा विचार करुन खर्च कमी होण्याच्या द्दष्टीने मध्यवर्ती संकलपचित्र संघटना, कडून मंजूर घ्यावे.

ड) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे. या कामांना सुधारित प्रशाकिय मान्यता दिली जाणार नाही.

इ) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधितांनी विना मोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदी प्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची, दक्षता घ्यावी.

ई) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

प) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक भिंत मौजे बनपेठवाडी (येराड) ता. पाटण, जि. सातारा ग्रामपचांयतीने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे. तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र मौजे बनपेठवाडी (येराड) ता. पाटण, जि. सातारा ग्रामपंचायतीकडून प्राप्त करून घेण्याची. जबाबदारी तांत्रिक मान्यता देण्यास सक्षम अधिकाऱ्यांची असेल.

फ) सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून काम पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरित उपलब्ध करून द्यावे.

ग) सदरहू कामास तांत्रिक मंजुरी देण्यापूर्वी संदर्भ क्र. १ मधील अटींचे कोटेकोरपणे पालन करावे. सदरच्या ठिकाणी पूररेषा निश्चितीची कार्यवाही पूर्ण झाल्याखेरीज या कामांस तांत्रिक मंजुरी देता येणार नाही.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च “४७११, पूर नियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे भागभांडवली अंशदान (४७११ ०२०९)”या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ०२ /सन २०१९-२० वर नोंदविण्यात आलेली आहे.

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका -१९७८ भाग पहिला मधील तरतुदीनंतर प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२००३०६१५१५२९४४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhakar Nageshrao Aivale

Digitally signed by Sudhakar Nageshrao Aivale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2cc5f92716ab534e424b50ac729583cabc178f93f59c9d32f0507cd1020c53d3, cn=Sudhakar Nageshrao Aivale
Date: 2020.03.06 15:18:52 +05'30'

**( सु.ना. ऐवळे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,

३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई

४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,

५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,

७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,

८) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

९) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०) आंतरवित्त सल्लागार व उप सचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे,

१४) मुख्य अभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, पुणे

१५) अधीक्षक अभियंता, सातारा सिंचन मंडळ, सातारा

१६) कार्यकारी अभियंता, कोयना सिंचन विभाग, कोयनानगर

१७) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.